**मूळ भूमापन नकाशांचे डिजिटायझेशन करण्यासंदर्भात सहा जिल्ह्यांसाठी मागविण्यात आलेल्या निविदांच्या मूल्यमापनासाठी निविदा मुल्यमापन समिती व डिजिटायझेशनच्या कामाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी जिल्हा स्तरीय सुकाणू व संनियंत्रण समिती स्थापन करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वनविभाग,**
**शासन आदेश क्रमांक राभूअ-२०१६/१२९९/प्र.क्र. ३३६/ल-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २४ नोव्हेंबर, २०१६

वाचा :- जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक:-पु.मो. १/प्र.क्र. ९४/२०१६, दिनांक १९.०८.२०१६.

**प्रस्तावना :-**

डिजिटल इंडिया भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रमांतर्गत मुळ भूमापन नकाशांचे डिजिटायझेशन करण्यासाठी पहिल्या टप्प्यामध्ये पुणे, रायगड, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या सहा जिल्ह्यांची निवड करण्यात आली आहे. या सहा जिल्ह्यांमधील एकूण ७८ तालुक्यातील सर्व उपअधीक्षक भूमि अभिलेख कार्यालयांच्या अभिलेख कक्षांमधील महत्वाच्या १३ नकाशांच्या डिजिटायझेशनचे काम करण्यात येणार आहे. या कामासाठी ई-टेंडरिंग पद्धतीने निविदा मागविण्यात आलेल्या आहेत. सदर निविदा प्रक्रिया राबविताना प्राप्त निविदांचे तांत्रिक मूल्यमापन करण्यासाठी निविदा मुल्यमापन समिती (Tender Evaluation Committee) व या कामाच्या प्रभावी अंमलबजावणीकरीता जिल्हा स्तरीय सुकाणू व संनियंत्रण समिती (District Steering & Monitoring Committee) स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या अनुषंगाने शासन खालील प्रमाणे आदेश निर्गमित करत आहे:-

**आदेश**

(अ) **(एक)** भूमापन नकाशांच्या डिजिटायझेशनच्या कामासाठी ई-टेंडरिंग पद्धतीने प्राप्त निविदांचे तांत्रिक मूल्यमापन करण्यासाठी खालील प्रमाणे निविदा मुल्यमापन समिती (Tender Evaluation Committee) गठीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिका-याचे पदनाम | समितीतील पद |
|---|---|---|
| १ | जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (म.राज्य) पुणे | अध्यक्ष |
| २ | उपसंचालक भूमि अभिलेख, संलग्न जमाबंदी आयुक्त (सर्वसाधारण), पुणे | सदस्य |
| ३ | उपसंचालक भूमि अभिलेख, संलग्न जमाबंदी आयुक्त (भूमापन), पुणे | सदस्य |
| ४ | उपसंचालक भूमि अभिलेख, पुणे | सदस्य |
| ५ | तांत्रिक संचालक, राष्ट्रीय भूमि अभिलेख अद्ययावतीकरण कार्यक्रम, पुणे | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ६ | सहाय्यक लेखाधिकारी, राष्ट्रीय भूमि अभिलेख अद्ययावतीकरण कार्यक्रम, जमाबंदी आयुक्त कार्यालय, पुणे | सदस्य |
| ७ | संचालक, महाराष्ट्र रिमोट सेन्सिंग ॲप्लीकेशन सेंटर (MRSAC), नागपूर | सदस्य |
| ८ | कार्यालय अधीक्षक पुनर्मोजणी १, जमाबंदी आयुक्त कार्यालय, पुणे | सदस्य सचिव |

**(दोन) उपरोक्त निविदा मूल्यमापन समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल:-**

१. तांत्रिक निविदा (Technical Bid) उघडण्याची कार्यवाही करणे.
२. निविदाधारक संस्थांनी सादर केलेल्या कागदपत्रांची पडताळणी करणे.
३. निविदाधारक संस्थांनी सादर केलेल्या कागदपत्रांच्या आधारे त्यांचे तांत्रिक मुल्यमापन करणे.
४. निविदाधारक संस्थांनी केलेल्या सादरीकरणाचे मुल्यमापन करणे.
५. तांत्रिक गुणवत्तेच्या आधारे वाणिज्यिक निविदा (Commercial Bid) उघडण्यासाठी पात्र ठरलेल्या निविदाधारक संस्थांची निवड करणे.
६. वाणिज्यिक निविदा (Commercial Bid) उघडणे.
७. निविदेमधील अटी व शर्तीनुसार प्रत्येक जिल्ह्यासाठी निविदाधारक संस्थेची निवड करणे.
८. निविदेमधील अटी व शर्तीनुसार निविदाधारक उपलब्ध न झाल्यास संबंधित निविदेस मुदतवाढ देणे, नविन निविदा प्रसिद्ध करणे इत्यादीबाबत निर्णय घेणे.

**(ब) (एक)** -भूमापन नकाशांचे डिजिटायझेशन करणे॰ या प्रकल्पाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी पुणे, रायगड, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या जिल्ह्यांकरीता संबंधित जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे जिल्हा स्तरीय सुकाणू व संनियंत्रण समिती (District Level Steering and Monitoring Committee) गठित करण्याबाबतही जमाबंदी आयुक्त, पुणे यांनी प्रस्तावित केले आहे.

| अ.क्र. | अधिका-याचे पदनाम | समितीतील पद |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | उपसंचालक भूमि अभिलेख (संबंधित विभाग) | सदस्य |
| ३ | जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख (संबंधित जिल्हा) | सदस्य सचिव |
| ४ | उपअधीक्षक भूमि अभिलेख (संबंधित जिल्ह्यातील सर्व) | सदस्य |

**(दोन) उपरोक्त जिल्हा स्तरीय सुकाणू व संनियंत्रण समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल:-**

१. निविदेमधील अटी व शर्तीनुसार जिल्हयातील डिजिटायझेशनच्या कामाच्या अंमलबजावणीचे प्रभावी संनियंत्रण करणे.
२. संबंधित जिल्ह्यासाठी निवड झालेल्या निविदाधारक संस्थेकडून करार झालेल्या दिनांकापासून १५ दिवसाच्या आत सविस्तर प्रकल्प अहवाल प्राप्त करुन घेणे.

३. निविदेमध्ये दिलेल्या विहीत कालमर्यादेत जिल्ह्यातील डिजीटायझेशनचे काम पूर्ण करुन घेणेभूमापन . नकाशांच्या डिजिटायझेशनच्या कामाचे निविदाधारक संस्थेकडून Proof of concept करुन घेणे.

४. निविदाधारक संस्थेस नकाशांचे डिजिटायझेशन तसेच मेटा डेटा एन्ट्री करण्याकरीता जागा उपलब्ध करुन देण्यास मदत करणे.

५. तालुकास्तरीय नियंत्रण पथक तयार करुन त्यांचे मार्फत कामकाजाची सविस्तर माहिती प्राप्त करुन घेणे, निविदाधारक संस्थेशी वेळोवेळी चर्चा करुन संबंधितांना योग्य ते मार्गदर्शन करणे.

६. निविदाधारक संस्था व तालुका स्तरावरील पथक यांचेमध्ये समन्वय राखणे.

७. नकाशांचे स्कॅनिंग झाल्यावर निविदाधारक संस्थेकडून नकाशांच्या एकूण संख्येच्या ०.५% प्रिंट आऊट प्राप्त करुन घेणे व त्यांची तपासणी संबंधित कार्यालयामार्फत करुन घेणे.

८. मेटा डेटा एन्ट्रीची संबंधित तालुक्याच्या अधिकारी व कर्मचारी यांच्याकडून तपासणी करुन घेणे.

९. डिजिटायझेशन झालेल्या नकाशांचे १% प्रिंट आऊट निविदाधारक संस्थेकडून प्राप्त करुन त्यांची संबंधित कार्यालया- मार्फत तपासणी करुन घेणे.

१०. निविदाधारक संस्थेकडून क्वालिटी प्लॅन तयार करुन घेणे. डिजिटाईज्ड नकाशांचे १००% on screen validation करण्यासाठी संबंधित संस्थेकडून दोन संगणक (सॉफ्टवेअर सहीत) व गुणवत्ता तपासणी (Quality check) बाबत कार्यालयातील कर्मचा-यांना ट्रेनिंग देणेकामी दोन कुशल कर्मचारी प्राप्त करुन घेणे.

११. निविदाधारक संस्थेकडून Deliverables मध्ये ठरविल्याप्रमाणे .*tiff, *.shp, *.dwg, *.PDF/A या Format मध्ये डिजिटायझेशनचा डाटा प्राप्त करुन घेणे.

१२. निविदाधारक संस्थेकडून प्रत्येक आठवडयाला प्रोजेक्ट स्टेटस रिपोर्ट प्राप्त करुन घेणे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१६११२५१००३५४१५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh
Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2016.11.25 10:07:01 +05'30'

**(डॉ संतोष भोगले)**
शासनाचे उप सचिव,

**प्रत**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव

४) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव

५) मा. मुख्य सचिव यांचे सहसचिव

६) अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव (मा.तं), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) सर्व विभागीय आयुक्त
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) उप महा निदेशक, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, पुणे
१३) संचालक, महाराष्ट्र रिमोट सेन्सिंग ॲप्लीकेशन सेंटर MRSAC, नागपूर
१४) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१६) कोषागार अधिकार, पुणे
१७) राज्य सूचना विज्ञान अधिकारी, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, मुंबई
१८) कार्यासन अधिकारी, ब-१ व ब-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) निवड नस्ती, ल-१.